# आपल्या घराकडे

लेखक: इव्ह बंटींग

चित्रे: डेव्हीड डायझ



# आपल्या घराकडे

मराठी अनुवादः सुशील मेन्सन



“आपण घरी चाललोय, *कार्लोस*,” आई मला कुरवाळत म्हणाली.

तिचे डोळे आनंदाने चमकत होते. “इथेही घर आहे,” ती म्हणाली. “पण तिथेसुद्धा आहे.”

आई आणि बाबा खुशीत होते. माझ्या बहिणीचं आणि माझं मात्र तसं नव्हतं. आमचा जन्म जरी मेक्सिकोत झालेला असला तरी ते काही आमचं घर नव्हतं.

बाबांनी जुन्या गाडीत सामानाचे खोके आणि बॅगा भरल्या. प्रवासासाठी खाण्यापिण्याचे पदार्थ भरून ठेवलेला कुलरचा खोकासुद्धा त्यांनी सामानात ठेवला. माझी लहान बहीण *नोरा* आणि माझी मोठी बहीण *डोलोरेस* माझ्यासोबत गाडीच्या मागच्या सीटवर बसले. नोरा पाच वर्षांची आहे आणि डोलोरेस दहा वर्षांची.

बाबांनी घराचा दरवाजा कुलुप लावून बंद केला. हे घर खरंतर मजूर व्यवस्थापक, *कुल्लोडन*काकांचं आहे. पण जोवर आम्ही त्यांची शेती सांभाळतोय, तोवर त्यात आम्ही हक्काने राहू शकतो. गेली पाच वर्ष हे घर आमचंच आहे. शिबिरातले जवळपास सर्वजण आम्हाला निरोप देण्यासाठी आले.

नोराने तिच्या घनिष्ट मैत्रिणीला, *मारीया*ला, हात हलवून टाटा केला.

“उदास होऊ नकोस, नोरिता,” डोलोरेस म्हणाली. “आपण फक्त ख्रिसमससाठी चाललोय. त्यानंतर तू पुन्हा मारीयाला भेटू शकशील.”

मग आमचा प्रवास सुरू झाला.





माझ्या आईबाबांचं गाव, *ला-पेरला*, खूप दूर आहे. मेक्सिकोची सीमा पार करताना आम्हाला थोडं भय वाटलं.

"ते आपल्याला पुन्हा परतू देतील, बाबा?" मी विचारलं.

"हो देतील. तू चिंता करू नकोस. आपण कायदेशीर शेतमजूर आहोत. आपल्याकडे अधिकृत *पेपेलेस* आहेत."

"कागदपत्रं म्हणा बाबा!" मी त्वरीत म्हणालो.

"*सी, पेपेलेस.*" बाबा बऱ्याचदा स्पॅनिश भाषेत बोलत. त्यांना आणि आईला इंग्लिश येत नव्हतं. शेतात काम करताना त्याची गरजही लागत नसे. पण मी त्यांना नेहमी शिकवायचा प्रयत्न करायचो.

एकदाचं आम्ही मेक्सिकोत पोहोचलो.

मला काहीच फरक पडला नाही, पण आईला पडला.

"मेक्सिको! मेक्सिको!" तिने वर बघत भर हिवाळ्यात सूर्यप्रकाशाने झाकोळलेल्या आभाळाकडे उडती चुंबनं फेकली.




रात्री आई आणि माझ्या बहिणी गाडीतच झोपले. बाबा आणि मी घोंगडी अंगावर घेऊन जमिनीवर झोपलो. मी आभाळातले तारे बघू लागलो.

“खरंच ला-पेरला खूप छान आहे का?” मी विचारलं.

“होय, मिजो,” बाबा म्हणाले. “पण गाव तसं छोटंसंच आहे.”

“तुम्ही खूप छान छान गोष्टी सांगितल्यायत आम्हाला गावच्या,” मी म्हणालो.

“होय,” बाबा अंधारात खुशीत हसतायत असं वाटलं. “अगदी टुमदार आहे गाव!”

“मग तुम्ही आणि आईने गाव का सोडला?”

मी आणि डोलोरेस हा प्रश्न नेहमी विचारत असू आईबाबांना. त्यांचं काम किती कष्टाचं आहे, ते आम्ही पाहिलं होतं. स्ट्रॉबेरीच्या शेतातलं रणरणतं ऊन! टोमॅटोच्या रांगामध्ये तळपणारा सूर्य! आमच्या चेहऱ्याचे चावे घेणाऱ्या छोट्या छोट्या माशा! सुट्टीच्या दिवसांत आम्हीसुद्धा शेतात काम करायचो, म्हणून एवढं माहीत झालं होतं आम्हाला.



रात्री आईबाबा किती थकून जातात, हे आम्ही पाहिलं होतं. बाबा आईचे खांदे चेपून देत असत. त्यांना चालणंही कठीण होऊन जायचं. "तुम्ही गाव सोडलातच का?" आम्ही त्यांना विचारत असू.

"ला-पेरलामध्ये करायला काही कामधंदा नव्हता. तो शोधण्यासाठी गाव सोडून इथे आलो आम्ही," हे त्यांचं ठरलेलं उत्तर होतं.

कधीकधी बाबांच्या मागे डोलोरेस त्यांची नक्कल करायची. "कामधंदा शोधण्यासाठी गाव सोडून इथे आलो, म्हणे. पण मला तर इथे काहीच चांगला कामधंदा दिसत नाही." डोलोरेस मोठी झाली होती आणि स्वभावाने शांत होती. त्यामुळेच आईला सतत तिची चिंता वाटायची.

बाबांच्या शेजारी झोपलो असताना आभाळात वेगाने जाणारी एक उल्का दिसली मला. मी एक इच्छा व्यक्त केली.



आम्ही छोट्या छोट्या शहरांमधून प्रवास केला. आमच्या गाडीमागे धावणाऱ्या कुत्र्यांना टाटा केला. नोरा अधूनमधून विचारायची, "ला-पेरला आलं का?" आणि बाबा उत्तर द्यायचे, "अजून नाही, बाळा."

आम्ही सुंदर, टुमदार गावांमधून प्रवास केला. तिथे दिव्यांच्या खांबांवर फुलं टांगली होती आणि तिथले रस्ते गुळगुळीत, चमकदार दगडांनी बनले होते.

“ला-पेरला आलं का, बाबा?”

“अजून नाही, नोरिता.”



वाटेत आम्हाला बसगाड्या दिसल्या.
आम्हाला सायकलवर बसून जाणारे पुरुष आणि बायका दिसल्या.
जळणाच्या लाकडांचा ढीग आपल्या गाढवावर लादून चालणारा एक म्हातारा माणूस आम्ही पाहिला. तो थांबून आमच्याकडे बघू लागला.
कधीकधी गाडी हळू चालवावी लागत असे. कारण मेंढ्यांचे कळप वाटेत अडथळे आणत. त्यांच्या अंगावर दाट जाडजूड लोकर होती.



चार दिवस प्रवास करून संध्याकाळी आम्ही ला-पेरलाला पोहोचलो. नोराने प्रश्न विचारणं बंद केलं होतं. त्यामुळे आईने सांगितल्यावरच आम्हाला कळलं.
आमची गाडी रस्त्याच्या कडेने चालली होती. ख्रिसमससाठी रस्ता लाल, गुलाबी, पिवळ्या आणि निळ्या रंगाच्या कागदी पताकांनी सजवला होता. इथे-तिथे विखुरलेली घरं, एक किराणामालाचं दुकान, एक मोठी पाण्याची टाकी, एक चर्च ज्यावर चमचमता तारा सजवला होता असं सगळं दृश्य होतं गावाचं. आम्ही ज्या ज्या गावातून प्रवास केला, तसंच गाव होतं ला-पेरला.
बाबांनी गाडीचा हॉर्न वाजवला, तो ऐकून लोक आपापल्या घराच्या दारात आले. बाबांनी गाडीच्या खिडकीची काच खाली केली.
“बघा, *जोस* आणि *कॉन्सेलो* सहकुटुंब आलेयत आपल्या घरी, ख्रिसमससाठी,” बाबा मोठ्या आवाजात म्हणाले.

"जोस! कॉन्सेलो!"

“गोड आहेत तुमची मुलं,” गावकरी म्हणाले. “त्यांचे कपडे सुंदर आहेत, कॉन्सेलो!” आई स्मित करत म्हणाली, “फार काही सुंदर नाहीयेत ते.”

आमच्याभोवती मुलं गोळा झाली. मग आई दबक्या आवाजात म्हणाली, “ते बघा तुमचे आजोबा! आणि आत्या ॲना!”

एका घरातून एक म्हातारा माणूस बाहेर आला. त्याच्या मागे काळ्याभोर केसांची एक उंच, बारीक बाई होती.

“ती छत्रीसारखी दिसते,” डोलोरेस कुजबुजली आणि हसू लागली.

नोरा लहान मुलांसारखी अंगठा चोखू लागली. नोरा खूप लाजाळू होती.

आजोबांच्या घराबाहेर एक लाकडी नांगर होता. आईबाबांनी या नांगरासाठी पैसे साठवले होते, हे मला आठवलं. त्यांनी दोन बैलांसाठीसुद्धा पैसे पाठवले होते आजोबांना. बैल कुठे दिसले नाहीत. आम्ही मित्र बनलो असतो कदाचित.

आजोबांनी, आत्याने आम्हाला कुरवाळलं. ते आम्हाला अनोळखी वाटले नाहीत.

त्या रात्री गावातला प्रत्येकजण आजोबांच्या घरी आला. जुन्या आठवणींना ऊत आला. मी आईबाबांना इतकं आनंदी कधी पाहिलं नव्हतं.

“इंग्लिशमध्ये बोल काहीतरी,” एक बाई मला म्हणाली. सगळेजण शांत झाले, ऐकण्यासाठी.

काय बोलायचं, मला कळेना. “छान वाटलं इथे येऊन,” मी चाचरत बोललो. सगळे हसून टाळ्या वाजवू लागले. “भाग्यवान आहेस, कॉन्सेलो! तुझा मुलगा आणि मुली सफाईदार इंग्लिश बोलतात. हशार आहेत ती!”

“होय,” बाबा म्हणाले. “त्यांची शाळा छान आहे. चांगलं शिकवतात तिथे.”

एका बाईने मान हलवली. “तुम्ही चांगला निर्णय घेतलात, तिथे जायचा. इथली शाळासुद्धा तशी बरीय. पण इथे कामधंदा मिळतं नाही पुढे.”

मी डोळे मिचकावले. पुन्हा कामधंदा!

“आम्ही शहाणं बनलो,” आई म्हणाली. “पण तिथलं आयुष्य खडतर आहे, इथल्यापेक्षा कष्टाचं.” आई अगदी रडवेली झाली. तिला बघून मला भीती वाटली. पण थोड्याच वेळात ती पुन्हा हसू लागली.

मग मला थोडंथोडं समजू लागलं.



सगळे लोक निघून जाईपर्यंत खूप उशीर झाला. आई-बाबा आजोबांच्या घरात जमिनीवर झोपले आणि आम्ही गाडीत झोपलो. फार काळोख झाला नव्हता, कारण ख्रिसमसचा चंद्र आभाळात चमकत होता आणि घरांच्या खिडक्यांवर दिव्यांची रोषणाई लखलखत होती.

"तुम्हाला आवडेल इथे झोपायला," आई हसतहसत म्हणाली. "इथे खूप सुरक्षित आहे."

डोलारेस आणि माझ्यामध्ये नोरा झोपली. ती झोपल्यावर आम्ही गप्पा मारू लागलो.

"आई-बाबांना त्यांचं गाव खूप आवडतं," मी कुजबुजलो.

तेवढ्यात गाडीच्या खिडकीबाहेरून एक मोठ्ठा चेहरा डोकावून आत बघू लागला.

मी उडी मारून बसलो. ती एक गाय होती. ती कुतूहलाने आमच्याकडे बघत होती.

"ला-पेरला सुंदर आहे," मी म्हणालो. "आईबाबांसाठी तर खासच आहे. त्यामुळेच ते एवढे खुश आहेत इथे."

"फक्त त्यामुळेच नसावेत खुश," डोलोरेस म्हणाली. मी कान देऊन ऐकू लागलो, कारण डोलोरेसला बऱ्याच गोष्टी माहीत असतात. पण ती एवढंच म्हणाली, "श्श! झोपू आता!"



मग कुणीतरी आजोबांच्या घरातून बाहेर पडले. आई आपला नवाकोरा पांढरा नाइट गाऊन घालून आणि बाबा पट्ट्यापट्ट्यांचा पायजमा घालून बाहेर पडले होते.

मी माझे डोळे अर्धवट मिटले. आईने गाडीचं दार उघडलं आणि आमच्यावर घोंगड्या पसरवल्या. "माझी गोंडस बाळं ती!" ती पुटपुटली.

आणि मग....मग काही अजबच घडलं. ती आणि बाबा नाच करू लागले. कसलंही संगीत नव्हतं तिथे, तरीही ते अनवाणी पायांवर गल्लीतच नाच करू लागले. कुत्रे त्यांचे पाय हुंगण्यासाठी त्यांच्या जवळ गेले. त्या जिज्ञासू गायीलासुद्धा त्यांचा नाच बघायला मजा येत होती. आईबाबांनी सगळ्यांकडे दुर्लक्ष केलं.

डोलोरेस आणि मी माना उंचावून त्यांचा नाच बघू लागलो. "आई किती तरूण आणि सुंदर दिसतेय!" डोलोरेस पुटपुटली. "आणि बाबा.... किती देखणे!"

"ती तिचं खांद्याचं दुखणं विसरूनच गेलीय," मी म्हणालो.

"आणि बाबा त्यांच गुडघ्याचं दुखणं विसरून गेलेत," डोलोरेस म्हणाली.



ते बेधुंद होऊन नाचत होते. बाबांच्या गालांवर आईचे केस पसरले होते. ते तिच्या कानात काही कुजबुजत होते. त्यांचा नाच बघणं बरोबर नाही, असं वाटून मी पुन्हा झोपी गेलो. डोलोरेसनेसुद्धा तेच केलं.

थोड्या वेळाने आजोबांच्या घराचं दार बंद झाल्याचा आवाज झाला. आईबाबा पुन्हा घरात गेले असावेत.

माझ्या छातीत धडधडू लागलं. ते इथे खुश आहेत कारण हे त्यांचं घर आहे! त्यांनी आमच्यासाठी घर सोडलं!

"कार्लोस?" डोलोरेस म्हणाली. “आईबाबा पैसे साठवतायत, माहितीय तुला? एक दिवस ते इथे परतून आजोबांच्या घरात राहाणार आणि स्वत:च्या जमिनीत शेती करणार.”

“नक्की?” मी विचारलं.

“हो, नक्की,” डोलोरेस म्हणाली. “मी ऐकलंय त्यांचं बोलणं.”

हे ऐकून मी स्मित केलं. डोलोरेस आईबाबांचं बोलणं चोरून ऐकते, हे माहीत होतं मला. म्हणूनच तर तिला इतक्या गोष्टींची माहिती असते.

“छान,” मी म्हणालो. आमचं शिक्षण वगैरे पूर्ण झाल्यावरच आईबाबा त्यांच्या मनासारखं करतील, असं मला वाटलं.





आईबाबा ला-पेरला गावात परतून तिथल्या गल्लीत नाचतायत आणि ख्रिसमसच्या ताऱ्यावर चमकणारा चंद्र बघत मी तिथेच झोपलोय, असं दृश्य मला दिसू लागलं.

समाप्त